**सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षापासून नविन सॅटेलाईट केंद्र यांना मंजूरी देण्यासाठी कार्यपध्दती व निकष विहित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. एनजीसी २०२०/( ११५ /२०)/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ सप्टेंबर, २०२०.

राज्यातील ग्रामीण, डोंगराळ व आदिवासी भागामध्ये उच्च शिक्षण उपलब्ध होण्याच्या दृष्टिकोनातून महाराष्ट्र शासनाने "महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६" अंमलात आणलेला आहे. सदर अधिनियमातील कलम १०९ (४) नुसार नविन सॅटेलाईट केंद्र मंजुरीसाठी कालबद्ध तरतुद करण्यात आलेली आहे. तसेच, या तरतुदीस अनुसरुन अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने कार्यपध्दती निश्चित करावी, अशी तरतुद कलम १०९ (९) अन्वये करण्यात आली आहे. सदरहू तरतुदींच्या अनुषंगाने सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून नविन सॅटेलाईट केंद्र मंजूरीसाठी कार्यपध्दती व निकष सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय:-**

१. सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षापासून नविन सॅटेलाईट केंद्रास मंजूरी देण्यासाठी पुढे विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

१.१.नविन सॅटेलाईट केंद्र सुरु करण्यास इच्छुक संस्थांनी "महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६" च्या कलम १०९ (४) (क) मधील तरतुदीनुसार त्या वर्षाच्या अगोदरच्या वर्षाच्या सप्टेंबर महिन्याच्या शेवटच्या दिवसापुर्वी सोबतच्या परिशिष्ट "अ" मधील अर्जाच्या नमुन्यात संबंधित विद्यापीठाकडे अर्ज दाखल करावेत. त्यासोबत परिशिष्ट "ब"मध्ये नमुद केलेली कागदपत्रे जोडण्यात यावीत.

१.२.विद्यापीठांनी ऑनलाईन (Online) पद्धतीने विहीत नमुन्यात अर्ज स्विकारावेत. अर्जात भरण्यात आलेली माहिती त्यासोबत आवश्यक असलेल्या कागदपत्रांची तपासणी करण्यासाठी एक तपशिलसूची तयार करुन आवश्यक बाबींची पुर्तता करणारेच अर्ज स्विकारावेत. ज्या विद्यापीठाकडे ऑनलाईन पद्धतीने संगणकप्रणाली (Software Development) विकसित करण्यात आलेले नाही, अशा विद्यापीठांनी अर्ज स्विकारण्याची संगणकप्रणाली विकसित करणे अनिवार्य आहे.

१.३.विद्यापीठांकडे प्राप्त झालेल्या अर्जांची छाननी अधिष्ठाता मंडळाकडून विहीत कालमर्यादेत करण्यात यावी.

१.४.प्राप्त अर्जांची व कागदपत्रांची पडताळणी सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट ब मध्ये नमुद करण्यात आलेल्या आवश्यक कागदपत्रांच्या सूचीनुसार पडताळणी समिती त्यांचा अहवाल १५ ऑक्टोबर पर्यंत कुलगुरुंना सादर करतील.

१.५. ज्या संस्थेच्या प्रस्तावात किंवा कागदपत्रांच्या त्रुटी आढळून आल्यास त्या संस्थेस / अर्जदारास २० ऑक्टोबर पर्यंत त्रुटी कळविण्यात येतील.

१.६. त्रुटी कळविण्यात आलेल्या संस्थांनी ३० ऑक्टोबरपर्यंत विद्यापीठाकडे त्रुटीची पुर्तता करणे आवश्यक राहील.

१.७. त्रुटीच्या पुर्ततेच्या अर्जाची छाननी समितीकडून करुन त्यासहीत छाननीत पात्र झालेल्या अर्जासह अहवाल १५ नोव्हेंबरपर्यंत अध्यक्ष अधिष्ठता मंडळ यांना सादर करण्यात येईल.

१.८. संबधित विद्यापीठाचे कुलगुरु विद्यापीठस्तरावर आवश्यक तेवढया तज्ञ समिती गठीत करतील सदर तज्ञ समितीमध्ये छाननीसमितीच्या सदस्यांचा अंतर्भाव असणार नाही. सदर तज्ञ समितीने १५ डिसेंबरपर्यंत प्रत्यक्ष भेटी देऊन नविन सॅटेलाईट केंद्रासाठी संबंधित संस्थांची सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट "ब" मध्ये विहित करण्यात आलेल्या सूचीनूसार तयारी आहे किंवा कसे याबाबत काटेकोर परिक्षण करुन त्याचा अहवाल व्हिडीओ छायाचित्रणासह १५ जानेवारीपर्यंत अध्यक्ष अधिष्ठाता मंडळामार्फत कुलगुरुंना सादर करण्यात येईल. सदर पायाभुत सोयीसुविधा पुर्ण न करणाऱ्या संस्थांची शिफारस विद्यापीठ करणार नाही.

१.९. कुलगुरुंकडून संबंधित पात्र संस्थांना २५ जानेवारी पर्यंत पात्रता व अपात्रता कळविण्यात येईल.

१.१०.अपात्रता कळविलेल्या संस्था १५ फेब्रुवारीपर्यंत त्याविरुध्द विद्यापीठाकडे अपिल दाखल करु शकतील. सदर अपिलावर (गरजेनुसार तज्ञ समिती पाठवून अहवाल घेऊन) १५ मार्चपर्यत कुलगुरु निर्णय देतील.

१.११.सर्व पात्र अर्जदार संस्थांचे अर्ज मंजूरीच्या शिफारशीसह विद्यापीठाकडून शासनाकडे दिनांक १ एप्रिलपर्यंत सादर करण्यात येतील.

१.१२.विद्यापीठाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावावर शासनाकडून १५ जूनपर्यंत परवानगी कळविण्यात येईल.

२. सर्व विद्यापीठांनी पाच वर्षांचा बृहत आरखडयासह प्रत्येक वर्षी वार्षिक योजना तयार करावी. त्यामध्ये ज्या जिल्ह्यामध्ये महाविद्यालयीन शिक्षणात ढोबळ पटसंख्या प्रमाण (जीईआर) राष्ट्रीय सरासरीपेक्षा कमी आहे असे जिल्हे ग्रामीण व आदिवासी भागासाठी सर्वोच्च प्राथम्य द्यावे व त्या प्राथम्यक्रमानूसार व तद्नंतर सर्वसाधारण याप्रमाणे त्या त्या शैक्षणिक वर्षासाठी विशिष्ट एवढ्याच नविन सॅटेलाईट केंद्राच्या (व्यावसायिक AICTE व NCTE मंजूरी देत असलेले अभ्यासक्रम सोडून) मंजूरीच्या प्रस्तावांची शिफारस करावी.

३. नविन सॅटेलाईट केंद्र मंजूरीच्या संदर्भात "महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६" मधील कलम १०९ (९) अन्वये परवानगीची कार्यपध्दती राज्य शासनाने विहीत करायची असून ती वरीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियमातील कलम १०९(६) मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे ज्या संस्था, वरीलप्रमाणे नविन सॅटेलाईट केंद्र मंजूरीसाठी अर्ज सादर करतील व ज्यांची यापूर्वीच महाविद्यालये अस्तित्वात आहेत, त्यांचेबाबतीत पुढील पुर्तता नसलेल्या संस्थांचे अर्ज शासनाकडे शिफारस करु नयेत.

४.१.ज्या महाविद्यालयांनी नॅक / एनबीए कडून मानांकन तसेच पुनर्मुल्यांकन करुन घेतले असून अशा मानांकनाचा कालावधी कृतीशिल नसेल तर:

४.२.जी महाविद्यालय सुरु करुन १० वर्षापेक्षा कमी कालावधीसाठी कार्यरत असेल तर, सॅटेलाईट केंद्राचे ठिकाण ग्रामीण व आदिवासी भागात नसेल तर,

५. महाविद्यालयाच्या मुख्य केंद्रापासून २०० कि.मी. त्रिज्येच्या परिसरात सॅटेलाईट केंद्र स्थापन करता येईल.(अपवादात्मक परिस्थितीत ही मर्यादा ३०० कि. मी. पर्यंत सकारण वाढविता येऊ शकेल.) तथापि, सॅटेलाईट केंद्र विद्यापीठाच्या कार्यक्षेत्राबाहेर असु शकणार नाही. अपवादात्मक परिस्थितीत संबंधित विद्यापीठाच्या कार्यक्षेत्राबाहेर परंतु महाराष्ट्र राज्याच्या सीमांतर्गत विशेष संशोधन अथवा विस्तार प्रकल्पाकरीता खास बाब म्हणुन असे केंद्र स्थापन करावयाचे असल्यास प्रस्तावित केंद्राचे ठिकाण ज्या विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रात येते त्या विद्यापीठाची पुर्वपरवानगी आवश्यक असेल. असे असले तरी, कवी कुलगुरु कालिदास विश्वविद्यालय रामटेक द्वारा प्रस्तावित केल्या जाणाऱ्या सॅटेलाईट केंद्रांना अन्य विद्यापीठाच्या पुर्वपरवानगीची अट लागू राहणार नाही. तसेच, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई यांच्या संलग्नित महाविद्यालयाचे सॅटेलाईट केंद्र अन्य राज्यात स्थापन करावयाचे असल्यास त्या राज्याची पुर्व परवानगी आवश्यक असेल.

६. प्रस्तावासोबत संस्थेने सॅटेलाईट केंद्र स्थापनेचा उद्देश व नियोजनबद्ध पंचवार्षिक सुस्पष्ट प्रकल्प आराखडा सादर करावा. त्यासाठीचा विहित पद्धतीने सादर करावयाचा अर्जाचा नमुना प्रत्येक विद्यापीठाने स्थानिक परिस्थितीनुसार तयार करावा. तसेच, प्रस्तावित अभ्यासक्रम अथवा प्रकल्पाकरीता आवश्यक प्रयोगशाळा साहित्य, पुस्तके इत्यादी बाबतीत विद्यापीठाने पर्याप्त नियम तयार करावेत.

७. Aspirational District या संकल्पनेअंतर्गत ग्रामीण व आदिवासी भागात सॅटेलाईट केंद्र सुरू करण्यासाठी प्राधान्य देण्यात यावे.

८. सॅटेलाईट केंद्रामध्ये किमान एक कौशल्य प्रमाणपत्र अभ्यासक्रम सुरू करणे आवश्यक आहे. राष्ट्रीय शैक्षणिक धोरणात सुचविल्याप्रमाणे Online व Open Distance Learning (ODL) पध्दतीचा वापर वाढविण्यासाठी सॅटेलाईट केंद्राचा उपयोग होऊ शकतो म्हणून त्यास्वरूपाची आवश्यक माहिती तंत्रज्ञान, व्यवस्था सॅटेलाईट केंद्रामध्ये उपलब्ध करून देणे अनिवार्य आहे.

९. नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण व प्रचलित विद्यापीठ अधिनियमानुसार नजिकच्या काळात पसंतीवर आधारित श्रेयांक पध्दतीचा पदवी व पदव्युत्तर स्तरावर अवलंब करणे आवश्यक आहे. विद्यार्थ्यांनी मिळविलेले श्रेयांक नंतरच्या काळात वापरण्यात येण्याची सोय असेल म्हणून यापध्दतीच्या चौकटीत पदवी व पदव्युत्तर स्तरावरील अभ्यासक्रमांतर्गत ऐच्छिक किंवा दुय्यम किंवा सुलभ कौशल्य अभ्यासक्रम सॅटेलाईट केंद्रामध्ये राबविण्याबाबत प्राधान्य देण्यात यावे.

१०. एका महाविद्यालयास सुरूवातीस एकच सॅटेलाईट केंद्र मान्य करण्यात येईल. सदरचे सॅटेलाईट केंद्र समाधानकारकरीत्या निदान ३ वर्ष चालविल्यानंतर वाढीव सॅटेलाईट केंद्रासाठी मान्यता देण्याबाबत विचार करण्यात येईल.

११. सॅटेलाईट केंद्राच्या संलग्निकरणाचे नुतनीकरण दर ३ वर्षातून एकदा विहित पद्धतीने केले जावे व सॅटेलाईट केंद्राचा सहामाही कार्यअहवाल महाविद्यालयाने विद्यापीठास विहित नमुन्यात सादर करावा. तसेच, महाविद्यालयाने सॅटेलाईट केंद्राचा वित्तीय हिशोब स्वतंत्र ठेवण्यात यावा.

१२. सॅटेलाईट केंद्रासाठी संबंधित महाविद्यालयातील एका सक्षम अर्हताकारी प्राध्यापकाची केंद्र समन्वयक म्हणुन ३ वर्षाच्या कालावधीकरीता नियुक्ती करावी.

१३. सॅटेलाईट केंद्र शैक्षणिक अभ्यासक्रम सुरु करावयाचे असल्यास प्रस्तावित स्थानापासून १५ कि.मी. परिसरात अशा अभ्यासक्रमाच्या मान्यता प्राप्त अध्यायनाची सोय असलेले संलग्नित महाविद्यालय नसावे.

१४. सॅटेलाईट केंद्रात पहिल्या पाच वर्षात नियमित पारंपारिक अभ्यासक्रम, संशोधन, विस्तार कार्यक्रम व शैक्षणिक अभ्यासक्रम अनुषंगिक अभ्यासानुवर्ती (co-curricular) कार्यक्रम, निरंतर शिक्षण कार्यक्रम, कौशल्य शिक्षण व विकासाचे प्रमाणपत्र, पदविका, प्रगत पदविका अभ्यासक्रम- अभ्यासेत्तर उपक्रम व समाजोपयोगी उपक्रम आणि औद्योगिक प्रकल्पाकरीता मान्यता मिळू शकेल, या करीता ज्या परिसरात असे अभ्यासक्रम व औद्योगिक प्रकल्प प्रस्तावित आहेत, त्या परिसरातील अशा स्वरुपाची गरज स्पष्ट करणारा सर्वेक्षण अहवाल प्रस्तावासोबत दाखल करण्यात यावा. सॅटेलाईट केंद्र हे प्रामुख्याने युवकांच्या कौशल्य विकासासाठी स्थापन करणे अपेक्षित असल्यामुळे कौशल्यावर आधारीत अभ्यासक्रमांना प्राधान्य देण्यात यावे.

१५. महाविद्यालयाच्या राष्ट्रीय सेवा योजना (N.S.S.), नॅशनल कॅडेट कोर्स (N.C.C.) व क्रिडा, कौशल्य, संशोधन विस्तार, कार्यक्रम व प्रकल्पासाठी सॅटेलाईट केंद्राचा संपर्क केंद्र म्हणुन विचार केला जावा.

१६. सॅटेलाईट केंद्राव्दारे कौशल्य विकास विभागाच्या प्रमोद महाजन कौशल्य विकास अभियानांतर्गत विविध कौशल्ये व उद्योजकता अभ्यासक्रम सुरू करावयाचा असेल तर त्यासाठी सदर अभियानांतर्गत लागू असणारे निकष जसेच्या तसे लागू राहतील.

१७. केंद्र शासनाच्या माध्यमातून सॅटेलाईट केंद्रामध्ये कौशल्य व उद्योजकता अभ्यासक्रमासोबत विविध प्रकल्प राबविण्यासाठी औद्योगिक आस्थापनेसोबत सामंजस्य करार करून CSR योजनेंतर्गत अर्थसहाय्य मिळविता येईल. तसेच जिल्हास्तरावर प्रशासकीय मान्यतेने किमान कौशल्य कार्यक्रमांतर्गत जिल्हा नियोजन विकास मंडळाकडून आर्थिक सहाय्य उपलब्ध करून घेता येईल.

१८. सॅटेलाईट केंद्राद्वारे Modular Employability Scheme List मधील एखादा अभ्यासक्रम चालू करावयाचा असल्यास संबंधित अभियानांतर्गत असलेले निकष लागू राहतील.

१९. वरील परि. १.४ मध्ये विहित केलेली पडताळणी समिती व परि. १.८ मध्ये विहित केलेली तज्ञ समिती यांची संख्या ती-ती विद्यापीठे त्या त्या वर्षी सरु करावयाच्या सॅटेलाईट केंद्र यांची व्याप्ती विचारात घेवून ठरवतील व विहित केलेल्या वेळापत्रकात काम होईल याची खातरजमा करतील.

२०. विद्यापीठांनी त्यांच्या कार्यक्षेत्रात उच्च शिक्षणांच्या सुविधांचे सर्वत्र समान वाटप होण्याच्या दृष्टीकोनातून सादर केलेल्या सन २०२४ पर्यंतच्या पंचवार्षिक सम्यक योजनेस मान्यता देण्यात आलेली आहे. सन २०२४ नंतर पंचवार्षिक सम्यक योजनेस मान्यता दिल्यानंतर त्याअनुषंगाने शासन निर्णयामध्ये अंशत: बदल करण्यात येईल.

सदर शासन, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९१८१५१७१८१६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Dattatray Vasantrao Kharke

Digitally signed by Dattatray Vasantrao Kharke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=higher & technical education dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, cn=Dattatray Vasantrao Kharke
Date: 2020.09.18 15:49:58 +05'30'

**(द.व.खारके)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) संचालक, उच्च शिक्षण,महाराष्ट्र राज्य, पुणे
२) मा. मंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव
४) मा. अप्पर मुख्य सचिव (उ.व तं.शि.)यांचे स्वीय सहाय्यक
५) सर्व विभागीय सहसंचालक, महाराष्ट्र राज्य
६) सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
७) मशि/विशि विभागातील सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती मशि-४

## * परिशिष्ट-अ *

### नविन सॅटेलाईट केंद्र

<table>
<tr><td>१.</td><td>संस्थेचे नाव व पूर्ण पत्ता :<br>(दुरध्वनी क्रमांकासह)</td><td></td></tr>
<tr><td>२.</td><td>महाविद्यालयाचे नाव आणि पुर्ण पत्ता :</td><td></td></tr>
<tr><td>३.</td><td>ज्या महाविद्यालयाव्दारे नविन सॅटेलाईट केंद्र सुरु करावयाची आहे, त्या ठिकाणाची लोकसंख्या :</td><td></td></tr>
<tr><td>४.</td><td>नविन सॅटेलाईट केंद्र सुरु करावयाचे सत्र :</td><td></td></tr>
<tr><td>५.</td><td>अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात नविन अभ्यास पाठ्यक्रम, विषय, विद्याशाखा, अस्तित्वात असल्यास त्याचा तपशिल (मुळ तुकडी अनुदानावर असेल तर तसा स्पष्ट उल्लेख करावा) :</td><td><table>
<tr><th></th><th>✓</th><th>विषय</th><th>विद्यार्थी संख्या</th></tr>
<tr><td>विद्याशाखा</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>अभ्यासक्रम</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>विषय</td><td></td><td></td><td></td></tr>
</table></td></tr>
<tr><td>६.</td><td colspan="2">आवेदन शुल्क रुपये-----/-, धनाकर्ष क्र.----------------<br>दिनांक ------------------ बँकेचे नाव--------------------<br>(धनाकर्ष कुलसचिव,-------------------------विद्यापीठ, यांचे नावे असावा.)</td></tr>
<tr><td>७.</td><td colspan="2">महाविद्यालयात नविन सॅटेलाईट केंद्राअंतर्गत सुरु करावयाच्या अभ्यासक्रमाचा तपशिल :<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>अभ्यासक्रम</th><th>अध्यापनाचे माध्यम</th><th>अध्यापनाचे विषय</th></tr>
<tr><td>१.</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>२.</td><td></td><td></td><td></td></tr>
</table></td></tr>
<tr><td>८.</td><td colspan="2">संस्थेचा पंजीयनाचा क्रमांक -------- व दिनांक -----------</td></tr>
<tr><td>९.</td><td colspan="2">संस्थेच्या संविधानात शैक्षणिक बाबींसंबंधी तरतुद असल्यास त्या तरतुदींच्या कलम क्र. व तद्नुसार नविन सॅटेलाईट केंद्र सुरु करण्यासंबंधीचा संस्थेचा ठराव क्र.----- व दिनांक --------</td></tr>
<tr><td>१०.</td><td colspan="2">आपण सुरु करणार असलेल्या नविन सॅटेलाईट केंद्रातील अभ्यासक्रमामुळे व उल्लेखित परिसरातील इतर महाविद्यालयाशी अवास्तव स्पर्धा निर्माण होईल काय ? ------------------------------------- -------------------------------</td></tr>
<tr><td>११.</td><td colspan="2">अ) संस्थेद्वारा चालविल्या जाणाऱ्या शाळा व महाविद्यालये यांचा तपशिल-----------------------<br>ब) सदर शाळा व महाविद्यालयांची मान्य प्रवेश क्षमता, प्रत्यक्ष प्रवेशित व परिक्षेस बसलेले विद्यार्थी ---------------------</td></tr>
<tr><td>१२.</td><td colspan="2">अर्ज केलेल्या वर्षातील ३१ मार्चला असलेली संस्थेची आर्थिक स्थिती :-<br>(अ) स्थावर मालमत्ता<br>(ब) जंगम मालमत्ता<br>(क) बँकेतील रोख<br>(ड) बँकेचे वा इतर कर्ज</td></tr>
<tr><td>१३.</td><td colspan="2">वरील उल्लेखित बाबींशिवाय महाविद्यालयाच्या आकस्मिक व अनाकस्मिक खर्चासाठी करण्यात येणाऱ्या आर्थिक तरतूदीचा तपशिल : ------------------------------------------------</td></tr>
</table>

**मुळ सही (शिक्क्याची नाही)**
**अध्यक्ष**
**(संस्थेचे नाव व पुर्ण पत्ता)**

**मुळ सही (शिक्क्याची नाही)**
**सचिव**
**(संस्थेचे नाव व पुर्ण पत्ता)**

## * परिशिष्ट-ब *

**संस्थेचे नाव :-** **विद्यापीठाचे नाव :**

**ठिकाण :-** **अभ्यासक्रम, प्रकल्प तपशिल :-**

| अ.क्र. | तपासणी सूची | पुर्ततेचा “तपशिल” (होय/नाही) | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|
| १. | संस्थेचा विहित नमुन्यात अर्ज. | | |
| २. | संस्था नोंदणी प्रमाणपत्राची साक्षांकित प्रत. | | |
| ३. | चालू वर्षाच्या तपशिलवार अंदाजपत्रकाची प्रत. | | |
| ४. | घटनेची साक्षांकित प्रत. | | |
| ५. | संस्थेच्या मागील वर्षाच्या लेखापरिक्षण अहवालाची प्रत. | | |
| ६. | किमान रु. ५.०० लाख फिक्स डिपॉजिटची प्रमाणित प्रत. | | |
| ७. | संबंधित संस्थेचे आर्थिक व्यवहार राष्ट्रीयकृत / शेड्युल बँकेमार्फत केले जात असल्याचे कागदपत्र. | | |
| ८. | संबंधित राष्ट्रीयकृत शेड्युल बँकेत ठेवलेला ठेव निधी विद्यापीठाच्या पुर्व परवानगीशिवाय न काढणेबाबतचे संबंधित राष्ट्रीयकृत बँकेचे व संस्थेचे संयुक्त आश्वासन पत्र. | | |
| ९. | शासनाचे कायम विनाअनुदानित धोरण लक्षात घेता, अर्जासोबत सॅटेलाईट सेंटरचा वेतन व वेतनेत्तर खर्च संस्था करणार असल्याबाबतचे रु.१००/- स्टँपपेपरवर नोंदणीकृत हमीपत्र. | | |
| १०. | नवीन सॅटेलाईट केंद्र सुरू करण्यासाठी मान्यता मागणाऱ्या संस्थेने बृहत आराखडयामध्ये निश्चित केलेल्या बिंदूच्या ठिकाणी जागा उपलब्ध असल्यासंदर्भातील कागदपत्रे.<br>**१ स्वत:ची जागा –**<br>अ) ½ एकर जागा संस्थेच्या नावावर असलेल्या सरकारी कागदपत्रांची प्रमाणित प्रत.<br>**२ भाडयाची जागा –**<br>अ) ½ एकर जागा संस्थेच्या नावे भाडे तत्वावर घेतलेल्या नोंदणीकृत कराराची प्रत. | | |
| ११. | **अ) स्वत:ची इमारत** (किमान क्षेत्रफळ ३००० चौ.फु.) – संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था किंवा इतर प्राधिकरणाचे बांधकाम पुर्णत्वाचे प्रमाणित उतारे. | | |
| | **१) शैक्षणिक व प्रशासकीय इमारत :** | | |
| | १.१ प्रशासकीय कार्यालय | | |
| | **१.२ अध्ययन कक्ष** | | |
| | **१.३ संगणक प्रयोगशाळा** | | |

| | | | |
|---|---|---|---|
| | **१.४ ग्रंथालय** | | |
| | १.५ **स्वच्छतागृह** (२० विद्यार्थ्यांमागे ०१ स्वच्छतागृह) महिलांसाठी स्वतंत्र स्वच्छतागृह व प्रसाधने | | |
| | **ब) भाडयाची इमारत :** (नोंदणीकृत भाडेकरार) संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था किंवा इतर प्राधिकरणाचे प्रमाणित उतारे.<br>(क्षेत्रफळाचा तपशिल खालील रकान्यात त्यांच्या नावासमोर नमुद करावा) | | |
| | १.१ प्रशासकीय कार्यालय | | |
| | **१.२ अध्ययन कक्ष** | | |
| | **१.३ संगणक प्रयोगशाळा** | | |
| | **१.४ ग्रंथालय** | | |
| | १.५ **स्वच्छतागृह** (२० विद्यार्थ्यांमागे ०१ स्वच्छतागृह) महिलांसाठी स्वतंत्र स्वच्छतागृह व प्रसाधने | | |
| | **२) २.१ पाणी सुविधा (पाणी पट्टी पावती)** | | |
| | **२.२ वीज सुविधा (वीज देयकाची प्रत)** | | |
| १२. | जो अभ्यासक्रम, निरंतर शिक्षण विषयक कार्यक्रम व प्रकल्प, कौशल्य शिक्षण सुरु करावयाचे आहे, त्याबाबत ग्रंथालयात पुस्तकाची सुविधा | | |
| १३. | सॅटेलाईट केंद्रासाठी संबंधित महाविद्यालयातून केंद्र समन्वयक म्हणुन नियुक्त करण्यात येणाऱ्या शिक्षकांचा शैक्षणिक अर्हतेसह तपशिल | | |
| १४. | महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियमातील कलम १०९(६) मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे ज्या संस्थेची यापुर्वीचे महाविद्यालय अस्तित्वात आहे अशा संस्थेने नविन महाविद्यालयाची मागणी केल्यास पुर्वीच्या महाविद्यालयाचे नॅक/एनबीए मुल्यांकन अथवा पुनर्मुल्यांकन असणे आवश्यक आहे. | | |

***************************